विधानसभा सार्वत्रिक निवडणुका - २०१४ च्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना पारिश्रमिक/ मानधन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: निभत्ता-०४१४/ प्र.क्र.६५/विशा-१अ**

दुसरा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :- १) शासन निर्णय क्र.निभत्ता ०४१४ / प्र.क्र.६५/ विशा १, दिनांक १६.११.२०१७.
२) जा.क्र.८३७३/अपोआ/पूप्रावि/कक्ष-५/वेतन/१८, दिनांक २२.११.२०१८.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र राज्यात दि. १५ ऑक्टोबर, २०१४ रोजी एकाच टप्प्यात विधानसभा सार्वत्रिक निवडणुका शांततेत पार पडलेल्या आहेत. विधानसभा सार्वत्रिक निवडणुकीची अधिसूचना जारी झाल्यापासून ते निवडणुकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीमध्ये, पूर्ण वेळ प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना समक्रमांकाच्या दिनांक १६.११.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये पारिश्रमिक / मानधन मंजूर करण्यात आले आहे.

त्यापैकी काही पोलीस अधिकारी / कर्मचारी यांचे पारिश्रमिक / मानधन सन २०१७ - १८ या वित्तिय वर्षामध्ये आहरित केलेले नाही. सदर पारिश्रमिक संबंधितांना अदा करण्याच्या अनुषंगाने सदर पारिश्रमिकाचा खर्च वित्तिय वर्ष २०१८ - १९ च्या मंजूर खर्चातून करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यातील विधानसभा सार्वत्रिक निवडणुका - २०१४ ची अधिसूचना जारी झाल्यापासून ते निवडणुकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यतच्या कालावधीमध्ये पूर्ण वेळ प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना पारिश्रमिक / मानधन देण्यास दिनांक १६.११.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, श्री. भागवत रामचंद्र चौधरी, पोलीस निरीक्षक तत्कालिन नेमणूक अलिबाग पोलीस ठाणे, रायगड तसेच श्री. शंकर निवृत्ती कवठेकर, पोलीस नाईक ३१५८५, ट्रॉम्बे पोलीस ठाणे यांचे पारिश्रमिक / मानधन सन २०१७ - १८ या वित्तिय वर्षामध्ये आहरित केलेले नाही. ते सन २०१८-१९ या वित्तिय वर्षाच्या अनुदानातून अदा करण्याची विनंती अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी शासनास केली आहे. त्यानुसार सदर मानधन / पारिश्रमिक सन २०१८ - १९ या वित्तिय वर्षाच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च हा मागणी क्र. “बी-१, २०५५ पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस - आस्थापना, दत्तमत (२०५५ ००९७) (०१) वेतन” या लेखाशीर्षाखाली सन २०१८ - १९ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २७४/१७/व्यय-७, दिनांक २८.०९.२०१७ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०६१७३११९०४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Damodar Patil

Digitally signed by Vijay Damodar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay Damodar Patil
Date: 2019.02.06 17:38:25 +05'30'

**( विजय पाटील )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा / विधान परिषद.
५. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१०. अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१३. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे स्वीय सहायक.
१४. पोलीस अधीक्षक, रायगड.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / बांद्रा.
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. वित्त विभाग, कार्यासन सेवा-९ / व्यय-४, मंत्रालय, मुंबई.
१९. सामान्य प्रशासन विभाग, का. क्र. ३३, मंत्रालय, मुंबई.१७)
२०. निवडनस्ती (कार्यासन विशा-१अ).